रत्नागिरी जिल्ह्यातील गुहागर तालुक्यातील पाटपन्हाळे - वाकी पिंपळवट - आरे ते प्रमुख राज्यमार्ग-४ रस्ता हा रस्ता प्रमुख जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नत करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
सार्वजनिक बांधकाम विभाग
शासन निर्णय क्रमांकः रवियो-२०१८/प्र.क्र.७८/नियोजन-२
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक- १ जानेवारी, २०१९.

पहावे :- १) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई यांचे पत्र क्रमांक मुअ(मुं)/रेखाचित्र शाखा/दर्जोन्नती-४५/१४४६, दि.०८/०३/२०१८.
२) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई यांचे पत्र क्रमांक मुअ(मुं)/रेखाचित्र शाखा/दर्जोन्नती-४५/६१४४, दि. २३/१०/२०१८.

**प्रस्तावना :-**

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई यांनी संदर्भाधिन पत्रांन्वये रत्नागिरी जिल्ह्यातील गुहागर तालुक्यातील पाटपन्हाळे - वाकी पिंपळवट - आरे ते प्रमुख राज्यमार्ग-४ हा रस्ता प्रमुख जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नत करणेबाबत प्रस्ताव सादर केलेला आहे. सदर रस्ता दर्जोन्नत करण्यास जिल्हा परिषद, रत्नागिरीच्या ठरावान्वये मागणी करण्यात आलेली आहे. सदर रस्त्याचे महत्त्व व जिल्हा परिषद, रत्नागिरी यांची मागणी विचारात घेता हा रस्ता प्रमुख जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नत करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय :-**

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई यांचा प्रस्ताव व जिल्हा परिषद, रत्नागिरी यांची मागणी विचारात घेता रत्नागिरी जिल्ह्यातील गुहागर तालुक्यातील खालील रस्ता दर्जोन्नत करण्यात येत आहे.

| प्रस्तावित रस्त्याचे नांव | रस्त्याचा क्रमांक | साखळी क्रमांक व लांबी (कि.मी.) | दर्जोन्नत करावयाची एकूण लांबी (कि.मी.) | दर्जोन्नती नंतरचा क्रमांक |
|---|---|---|---|---|
| पाटपन्हाळे - वाकी पिंपळवट - आरे ते प्रमुख राज्यमार्ग-४ रस्ता. | ग्रामीण मार्ग १२ | (०/०० ते ९/००) ९.०० कि.मी. | ९.०० कि.मी. | प्रमुख जिल्हा मार्ग-९८ |

परिणामी, रस्ते विकास योजना २००१-२१ मधील रत्नागिरी जिल्ह्यातील **प्रमुख जिल्हा मार्ग** रस्त्यांच्या एकूण लांबीत **९.०० कि.मी.** ने वाढ होवून एकूण लांबी (१८७१.६६० + ९.०० ) म्हणजेच **१८८०.६६० कि.मी.** इतकी होईल. तसेच **ग्रामीण मार्ग** रस्त्यांच्या एकूण लांबीत **९.०० कि.मी.** ने घट होऊन एकूण (६६०४.९०० - ९.००) म्हणजेच **६५९५.९०० कि. मी.** इतकी होईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०१०२१५२९०३२८१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Prashant Vinayakrao Patil

Digitally signed by Prashant Vinayakrao Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2b1bad66664b1e11e3bf66db1d526143e814db5f8c505422af66a5628314537e, cn=Prashant Vinayakrao Patil
Date: 2019.01.02 15:41:19 +05'30'

**(प्रशांत पाटील)**

अवर सचिव (नियोजन), महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१) विभागीय आयुक्त, मुंबई.

२) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करुन जिल्ह्याच्या संकेतस्थळी प्रसिध्द करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा)

३) जिल्हाधिकारी, रत्नागिरी.

४) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, रत्नागिरी.

५) अधिक्षक अभियंता,सा.बां.मंडळ,रत्नागिरी (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करुन जिल्ह्याच्या संकेतस्थळी प्रसिध्द करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा.)

६) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, रत्नागिरी.

७) संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई.

८) रस्ते विकास योजना २००१-२०२१ ची नस्ती.

९) निवडनस्ती.